(९८) २०१५०४२२१२२९३४२४२७

चोळमुख लघु पाटबंधारे योजना ता.पेठ, जि.नाशिक सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.लपायो २००३/७३३/(२१९/०५) खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ४ ऑक्टोबर, २००५

पहावे:- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे दि.७.५.२००५ चे पत्र क्रमांक ३८०५/लपा/चोळमुख/तां.१/१५७१.

**प्रस्तावना:-**

चोळमुख लघु पाटबंधारे योजना, ता.पेठ, जि.नाशिक या योजनेस शासन निर्णय, जलसंपदा विभाग, लपात ७८५/१७४६/(४८२/८५)/लपा-१, दि.१४.१०.१९८५ अन्वये एकुण रु.९४.१६ लक्ष रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. मुळ प्रशासकीय मान्यता मिळुन १५ वर्षे अनुदान उपलब्ध न झाल्यामुळे, शासन निर्णय, जलसंपदा विभाग, लपायो २०००/(३४१/२०००)/खारभूमी, दि.१६.१०.२००० अन्वये रु. ७४३.०० लक्ष इतक्या रकमेस नव्याने प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती व या योजनचे काम फेब्रुवारी, २००२ मध्ये सुरु करण्यात आले. या योजनेचे काम करीत असतांना दरसूचीच्या दरात झालेली वाढ, जास्त दरांची निविदा स्विकृतीमुळे वाढ, भूसंपादनाच्या किमतीतील वाढ, संकल्पचित्रातील बदलामुळे वाढ इ. कारणांमुळे झालेली वाढ व अनुषंगिक खर्चातील वाढ यामुळे या योजनेच्या किमतीत वाढ झाली आहे. त्यामुळे सन २००३-२००४ ची दरसूची वापरुन या योजनेचे सुधारीत अंदाजपत्रक तयार करुन रु.१०१६.०१ लक्ष किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचेकडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासननिर्णय:-**

१) नाशिक जिल्ह्याच्या पेठ तालुक्यातील चोळमुख लघु पाटबंधारे योजनेस सन २००३-०४ च्या दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या अंदाजित रु.१०,१६,०१,०००/- (रुपये दहा कोटी, सोळा लक्ष, एक हजार फक्त) त्यापैकी रु.८,२८,९१,०००/- कामाप्रित्यर्थ व रु.१,८७,१०,०००/- अनुषंगिक खर्च) खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२) या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च -८०० इतर खर्च (१) बांधकामे सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (एक) पंचवार्षिक योजना", या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

शासन निर्णय क्रमांक संकीर्ण १०९९/(१२६/९९)/मोप्र(प्र), दि.१८.५.९९ मधील 'अ' नुसार हा निर्णय जलसंपदा विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार तसेच आं. वि. स व उ. स. यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान केलेली सुधारीत प्रशासकीय मान्यता अ.क्र. ३४ वर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( भ. तु. रेडकर )
शासनाचे उप सचिव

प्रतिलिपी अदांजाच्या गोषवा-यासह:-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
मुख्य अभियंता (द व प्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे
आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, ठाणे लघु पाटबंधारे विभाग, ठाणे
उपसचिव (लघु पाटबंधारे)/अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थशाखा (५ प्रती)/ लपा-१/लपा-२/नियसं-३, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, नाशिक
स्वीय सहायक, मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.म.वगळून), मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी माहिती व जनसंपर्क, महासंचालनालयहा, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ)

(दिनांक ४ ऑक्टोबर, २००५ चा शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो २००५/७३३/ (२१९/०५)/खारभूमी चे सहपत्र)

विवरणपत्र

अंदाजपत्रकाचा गोषवारा

चोलमुख लघु पाटबंधारे योजना, ता.पेठ, जि.नाशिक

| अ.क्र. | उपशीर्ष | कामाची किंमत (रुपये) | | |
|---|---|---|---|---|
| | | (i) शीर्ष कामे | (ii) मुख्य कालवे व शाखा कालवे | एकूण |
| १ | ए-प्राथमिक | १,००,००० | २०,५०,००० | २१,५०,००० |
| २ | बी-भूसंपादन | ८५,९२,००० | २,००,००० | ८७,९२,००० |
| ३ | सी-कामे | ३,७१,६४,००० | -- | ३,७१,६४,००० |
| ४ | डी.-विमोचक | ५६,८५,००० | २,५०,००० | ५९,३५,००० |
| ५ | इ-फॉल | — | -- | — |
| ६ | एफ-आर.एच.टी.कामे | -- | २७,०७,००० | २७,०७,००० |
| ७ | जी-पूल | -- | ५,६०,००० | ५,६०,००० |
| ८ | एच-एकस्पे | -- | १,००,००० | १,००,००० |
| ९ | के-इमारती | १,५०,००० | ५०,००० | २,००,००० |
| १० | एल-मातीकाम | -- | १८,५६,००० | १८,५६,००० |
| ११ | एम-वृक्षरोपण | १,५०,००० | ५०,००० | २,००,००० |
| १२ | ओ-संकीर्ण | ९८,००० | ५०,००० | १,४८,००० |
| १३ | पी-देखभाल | १९,२८,००० | ८४,००० | २०,१२,००० |
| १४ | आर-दळणवळण | १,५०,००० | ५०,००० | २,००,००० |
| १५ | बंधारे | -- | १,८१,७३,००० | १,८१,७३,००० |
| | | | | |
| | (iii)वितरिका | — | २६,९४,००० | २६,९४,००० |
| | **कामाप्रीत्यर्थ** | ५,४०,१७,००० | २,८८,७४,००० | ८,२८,९१,००० |
| | अधिक अनुषंगिक खर्च २५.२५ टक्के (भूसंपादन वगळून) | | | १,८७,१०,००० |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | ५,४०,१७,०००/- | २,८८,७४,०००/- | १०,१६,०१,००० |
| | | | | |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | ४८० हेक्टर |
| नियोजित पाणीसाठा | ३९७६.४८ स.घ.मी. |
| पाणीसाठयाची प्रति स.घ.मी.किंमत (रु.) | २५५५० स.घ.मी. ( < रु. २८६७० (आर्थिक मापदंडात बसते.) |
| लाभव्यय गुणोत्तर | १.०९ > १.०० (आर्थिक मापदंडात बसतो) |